वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता/ समाजसेवा अधीक्षक (वैद्यकीय) व सामाजिक कार्यकर्ता /समाजसेवा अधीक्षक (मनोविकृती) या पदांच्या शैक्षणिक अर्हतेत सुधारणा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सेप्रनि २०२३/ प्र.क्र.५३०/ सेवा-५**
**गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,**
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ०२ ऑगस्ट, २०२३

वाचा :-

१)सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र. १०३६/प्र.क्र ४०/सेवा-१, दि.१८.०८.१९८८ व संलग्न अधिसूचना.

२) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र.१०८७/प्र.क्र १०२/८९/सेवा-१, दि. ३०.११.१९९१ व संलग्न अधिसूचना.

३)सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र.पदना २०१३/बदल/प्र.क्र.४६२/सेवा-५, दि.९.०५.२०१७.

४)केंद्र शासन मानसिक आरोग्य अधिनियम, २०१७ (The Mental Health Care Act,२०१७), दि. ०७.०४.२०१७.

प्रस्तावना:-

सार्वजनिक आरोग्य या विभागाच्या वाचा क्र. ३ येथील शासन निर्णय क्र. पदना २०१३/बदल/प्र.क्र ४६२/सेवा ५, दिनांक २९.०५.२०१७ नुसार वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता या पदाचे पदनाम बदलून समाजसेवा अधीक्षक (वैद्यकीय)असे करण्यात आले आहेत.

केंद्र शासनाच्या मानसिक आरोग्य अधिनियम, २०१७ अधिनियम लक्षात घेता समुपदेशन व मानसिक आरोग्याशी निगडीत सेवा देण्यासाठी विशिष्ठ अर्हता निश्चित केलेल्या आहेत. या वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता/ समाजसेवा अधीक्षक (वैद्यकीय) व सामाजिक कार्यकर्ता /समाजसेवा अधीक्षक (मनोविकृती) या पदांचे सेवाप्रवेश नियम केंद्र शासनाच्या मानसिक आरोग्य अधिनियम, २०१७ अस्तित्वात येण्या पूर्वी वाचा क्र. १ व २ नुसार गठीत करण्यात आलेले आहेत. यापुर्वी सन २०१८ मध्ये महापोर्टलवर दिलेल्या जाहिरातीतील शैक्षणिक अर्हतेवर तज्ञ प्राध्यापक, संघटना व उमेदवारांनी आक्षेप नोंदविल्याने तत्कालीन परिस्थितीत संचालक स्तरावर तज्ञ प्राध्यापक व प्रत्यक्ष रुग्णालयीन कामकाजासंबंधीत अधिकारी व डॉक्टर यांचे समितीने मानसिक आरोग्य अधिनियम, २०१७ व या पदांचे कर्तव्य व जबाबदाऱ्या लक्षात घेवून शैक्षणिक अर्हतेमध्ये सुधारणा करण्याची शिफारस केली होती. तत्कालीन परिस्थितीत शुध्दीपत्रकाद्वारे सदर सुधारणा अंर्तभुत करण्यात आली होती.

आता, अस्तित्वात असलेल्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीचा आढावा घेवून कालानुरुप झालेले बदल व त्यानुसार शैक्षणिक अर्हतेमध्ये वाढ करणे अपरिहार्य असल्याने जुने सेवाप्रवेश नियमात सुधारणा करुन अधिसूचित होईपर्यंत अस्तित्वात असलेल्या सेवाप्रवेश नियमातील शैक्षणिक अर्हतेमध्ये तातडीने सुधारणा करुन

जाहिरात देणे आवश्यक असल्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यास्तव सदर शासननिर्णय पारित करण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u>**-

या शासन निर्णयानुसार सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता/ समाजसेवा अधीक्षक (वैद्यकीय) व सामाजिक कार्यकर्ता /समाजसेवा अधीक्षक (मनोविकृती) या पदांसाठी पदभरती जाहिरातीमध्ये खालील नमूद सुधारित शैक्षणिक अर्हता अंर्तभूत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | पदनाम | मुळ शैक्षणिक अर्हता | सुधारित शैक्षणिक अर्हता |
|---|---|---|---|
| १ | वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता/ समाजसेवा अधीक्षक (वैद्यकीय) | १. Possess a degree of statutory University and a Diploma in Social Science **or**<br><br>२. A Master degree in arts with Sociology | Two year fulltime Master of social work (MSW) with Medical and Psychiatric Social Work specialization from recognized University. |
| २ | सामाजिक कार्यकर्ता /समाजसेवा अधीक्षक (मनोविकृती) | १. Possess a degree and possess a Diploma of statutory University or an institution recognized by government in Social Service administration with Medical and Psychiatric Social work as one of the subjects of Specialization, or a degree in Master of Social work with Psychiatry as one of the subjects. | Two years fulltime Master of social work (MSW) with Medical and Psychiatric Social work specialization, or a degree in Master of Social work with Psychiatry as one of the subjects from recognized University. |

तसेच, गुणवत्ता धारकाकडे मनोविकृती समुपदेशनाच्या अनुषंगाने महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था किंवा तत्सम संस्थेमध्ये /मनोरुग्णालय अथवा शासकीय रुग्णालयामध्ये कामाचा अनुभव नसल्यास अशा उमेदवारांना जिल्हा रुग्णालय/मानसिक आरोग्य संस्था/मनोरुग्णालयात प्रथम वर्षाकरीता नियुक्ती देवून आरोग्य संस्थांशी निगडीत कामकाजाचा परिविक्षाधीन स्वरुपात नियुक्ती देवून अनुभव घेणे आवश्यक राहील. जेणेकरुन प्रत्यक्ष

रुग्णालयीन कामकाजाच्या वेळी त्यांना आपल्या आरोग्य संस्थामध्ये प्रत्यक्ष कामकाजासाठी पुरेसा अनुभव मिळेल असेही जाहिरातीत नमूद करण्यात यावेत.

सदर सुधारणा अंर्तभूत करुन सेवाप्रवेश नियम अधिसूचित करण्याची कार्यवाही यशावकाश करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०११६३०१०३८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B4E19876AB3EEC36E3A3B988441648AB87470CDFE66B14CFBE7AC9BD770485C1, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2023.08.03 15:57:13 +05'30'

(अर्चना वालझाडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.
४) सहसंचालक, आरोग्य (सर्व)
५) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
८) वैद्यकीय अधीक्षक, मनोरुग्णालय (सर्व)
९) निवडनस्ती,सार्वजनिक आरोग्य विभाग (सेवा-५).
१०) नस्ती पदभ २०२२/प्र.क्र.१०३६/सेवा ५